कार्यालय अधीक्षक, गट-ब या संवर्गातून प्रशासकीय अधिकारी, गट-अ या संवर्गात पदोन्नती....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र१२५/फ-८**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ जून, २०१८

**पहा :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संचर्ग), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-७(१)/आस्था/ मुले /प्र.क्र.६० /११७/१७-१८ दि.६/११/२०१७.

२) सामान्य प्रशासन विभागाची अधिसुचना क्र एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.-१५६/कार्या-१२ दि.२८/०४/२०१५, दि.१५/०६/२०१७.

३) मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचा याचिका क्र.२७९७/२०१५ मधील दि.४/०८/२०१७ चा निर्णय.

४) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२ अे/१६-ब, दि.२९/१२/२०१७.

**शासन आदेश :-**

वन विभागातील कार्यालय अधिक्षक, गट-ब (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु.४४००) या संवर्गातून प्रशासकीय अधिकारी, गट-अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.६६००) या संवर्गातील खुल्या प्रवर्गासाठी राखीव जागांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने नियुक्ती सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | मंजूर महसूली संवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | पदोन्नतीने प्रस्तावित पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.डी.एम.डांगे | औरंगाबाद | अ.जा.तथा खुला प्रवर्ग | प्रशाकीय अधिकारी,मुख्य वन संरक्षक (प्रादे.) औरंगाबाद | रिक्त पदावर |
| २ | श्री.एम.ए.अब्दूल अजीज | अमरावती | खुला | प्रशाकीय अधिकारी,मुख्य वन संरक्षक (प्रादे.) यवतमाळ | रिक्त पदावर |
| ३ | श्री.एस.एम.वाणी | पुणे | खुला | प्रशाकीय अधिकारी,मुख्य वन संरक्षक (प्रादे.) कोल्हापूर | रिक्त पदावर |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. वर नमूद अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ/ तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती देण्यात येत आहे :-

**अ)** पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाजेष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६ /२०१७ च्या अधिन राहून भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग / १६ - ब यांनी दि.२९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या सुचनांनूसार मान्यता देण्यात येत आहे.

**ब)** वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही कार्यालय अधिक्षक, गट-ब या संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून जेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

**क)** सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

**ड)** सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पुर्व सूचना वा नोटिस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

**इ)** सदर पदोन्नती महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद तसेच मा.उच्च न्यायालय/ मा.सर्वोच्च न्यायालय इत्यादी ठिकाणी कार्यालय अधिक्षक, गट-ब या संवर्गातून अथवा प्रशासकीय अधिकारी संवर्गातून जेष्ठतेबाबत काही दावे / याचिका दाखल केले असल्यास, सदर प्रलंबित याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

**ई)** सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती ५०/५५ च्या वर्षाच्या पुर्नविलोकनाच्या निर्णयाच्या अधीन राहील.

४. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत प्रशासकीय अधिकारी पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना प्रशासकीय अधिकारी संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने प्रशासकीय अधिकारी या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

**६.** हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

**७.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०६०५१४५९११५०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.06.05 15:01:05 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) औरंगाबाद / अमरावती / पुणे.
५. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
६. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
९. सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१०.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) , म.रा.नागपूर यांचे मार्फत.
११.निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.